मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,खंडपीठ नागपूर यांच्या आदेशानुसार पदस्थापनेमध्ये सुधारणा करणेबाबत.
डॉ.प्रविण उल्हासराव सोनवणे, पशुधन विकास अधिकारी

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन आदेश क्रमांक : पसंप्र-२०१७/प्र.क्र.१४९/पदुम-१**
५ वा मजला विस्तार, मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक :- ०९ ऑगस्ट, २०१७

वाचा :- शासन आदेश क्र.पसंप्र-२०१६/प्र.क्र.३४५/दि.३१.०५.२०१७

शासन आदेश :-

डॉ.प्रविण उल्हासराव सोनवणे, पशुधन विकास अधिकारी,पवैद श्रेणी-१ वडेगांव, ता.तिरोडा, जि. गोंदिया यांची बदली दि. ३१ मे,२०१७ च्या आदेशान्वये पशुधन विकास अधिकारी, पवैद श्रेणी-१, विहिर गांव, ता. देसाईगंज, जि. गडचिरोली येथे करण्यात आली होती. सदर बदली आदेशाविरुध्द डॉ.सोनवणे, यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर येथे मुळ अर्ज क्र.३६४/२०१७ दाखल केला होता. सदर प्रकरणी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर यांनी दि. २०.६.२०१७ रोजी आदेश पारीत करुन डॉ.सोनवणे यांनी त्यांना पदस्थापना देण्याबाबत शासनाकडे दिलेल्या निवेदनांचा विचार करुन त्यावर निकालाच्या दिनांकापासून चार आठवडयाच्या आत सकारात्मक निर्णय घेण्याचे व तोपर्यंत डॉ.सोनवणे यांना कार्यरत पदावरुन कार्यमुक्त न करण्याचे निर्देश दिले आहेत. मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण , खंडपीठ नागपूर यांचे आदेश विचारात घेऊन, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि प्रतिबंध अधिनियम २००५ मधील कलम ४(४) व ४(५) मधील तरतूदी नुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या मंजूरीने डॉ.प्रविण उल्हासराव सोनवणे, पशुधन विकास अधिकारी, (गट-अ) यांच्या बदलीबाबत दि.३१.५.२०१७ च्या शासन आदेशामध्ये अंशत: बदल करुन आता त्यांची सुधारीत पदस्थापना खालील विवरणपत्रातील स्तंभ क्र.३ मध्ये नमूद ठिकाणी करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नांव | सुधारीत पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १. | डॉ.प्रविण उल्हासराव सोनवणे, पशुधन विकास अधिकारी,पवैद श्रेणी-१ वडेगांव, ता.तिरोडा, जि. गोंदिया | पशुधन विकास अधिकारी, पवैद श्रेणी-१, करडी, ता.मोहाडी, जि. भंडारा(रिक्त पदावर) |

२. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांनी पर्यायी व्यवस्था करुन डॉ.सोनवणे यांना कार्यरत पदावरुन तातडीने कार्यमुक्त करावे. तसेच डॉ. सोनवणे यांनी वरीलप्रमाणे पदस्थापनेच्या पदावर विनाविलंब रुजू व्हावे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१७०८०९१३२२२११००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vinod Sopanrao Mendhe

Digitally signed by Vinod Sopanrao Mendhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3dfd984bb7c5aede090473e34b1c93fa9f36d97d56c0cf07812a43c5ca5d6a24, cn=Vinod Sopanrao Mendhe
Date: 2017.08.09 13:13:13 +05'30'

**( वि.सो.मेंढे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :**

१. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध, पुणे-०७.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,गोंदिया/भंडारा/गडचिरोली
३. सहआयुक्त पशुसंवर्धन (मुख्यालय) पुणे.
४. प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त, नागपूर
५. जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, गोंदिया/भंडारा/गडचिरोली
६. जिल्हा कोषागार अधिकारी, गोंदिया/भंडारा
७. संबंधित पशुधन विकास अधिकारी द्वारा आयुक्त पशुसंवर्धन, म.रा.पुणे.
८. निवड नस्ती.